अकोला व लातूर सहकार न्यायालयाकरीता आहरण व संवितरण अधिकारी प्राधिकृत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राजस-१०१२/प्र.क्र.१६९/५-स

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १५ सप्टेंबर, २०१४

**वाचा :-**

१) शासन अधिसूचना क्र.सीएसएल-२०११/प्र.क्र.१११७/१५-स, दि.२७/४/२०१२
२) शासन समक्रमांक दिनांक ४/८/२०१२ चे ज्ञापन.
३) शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१६८/५-स, दिनांक २१/६/२०१४
४) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या नोटीफिकेशन क्र.अे-३९०२/२०१४ दि.१९/७/२०१४
५) निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.मरासअन्या/लातूर व अकोला सह.न्या./२०१४, दिनांक २१/७/२०१४.
६) शासन समक्रमांक दिनांक ८/८/२०१४ चे ज्ञापन
७) निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.मरासअन्या/आस्था/१२६२/१४, दि.२/९/२०१४.
८) सहायक लेखा अधिकारी, महालेखाकार कार्यालय नागपूर यांचे पत्र क्र.टीएम/ग्रुप ५/डीडीओ ५७३, दि.२/९/२०१४

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन अधिसूचनेनुसार नवीन ८ सहकार न्यायालयाच्या स्थापनेस मान्यता देण्यात आली. त्यात अकोला व लातूर येथील सहकार न्यायालयांचा समावेश होता. संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक ४/८/२०१२ च्या ज्ञापनान्वये अकोला व लातूर न्यायालयांच्या उभारणीच्या खर्चाकरीता अनुक्रमे अमरावती व नांदेड येथील सहकार न्यायाधीशांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले होते. संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक २१/६/२०१४ च्या शासन पत्रान्वये मा.प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांना सहकार न्यायालय, लातूर व सहकार न्यायालय, अकोला येथील सहकार न्यायालय सुरु करण्यासाठी न्यायाधीशांची नियुक्ती करण्याबाबत कळविण्यात आले होते. संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक १९/७/२०१४ च्या मा.उच्च न्यायालय मुंबई यांच्या नोटिफिकेशनद्वारे लातूर व अकोला येथे सहकार न्यायाधीशांची नियुक्ती करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.५ येथील दिनांक २१/७/२०१४ च्या पत्रान्वये निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांनी सहकार न्यायालय लातूर व अकोला येथील न्यायाधीशांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची विनंती केली होती. त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्र.६ येथे नमुद ज्ञापन निर्गमित करण्यात आले होते. तथापी निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांनी

दि. २/९/२०१४ च्या पत्रान्वये याबाबत शासन निर्णय आवश्यक असल्याचे कळविले आहे. त्यामुळे दि.८/८/२०१४ रोजीचे ज्ञापन रद्द करुन त्याऐवजी शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

सहकार न्यायाधीश,सहकार न्यायालय अकोला व सहकार न्यायाधीश,सहकार न्यायालय लातूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८/३/१९८४ मधील नमूद तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१५१८००५७०८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2014.09.15 17:56:11 +05'30'

**सुनिल पांढरे**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकार अपील न्यायालय मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती, नांदेड, लातूर, अकोला.
५) वित्त विभाग, व्यय-२, अर्थसंकल्प-१ व ३, विनिमय, कोषा-५, मंत्रालय, मुंबई
६) कक्ष अधिकारी, २२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री (सहकार)/ मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
८) सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,
९) निवड नस्ती.